**केंद्र शासनाकडून स्थापन करण्यात आलेल्या महादई पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र शासनाची बाजू समर्थपणे मांडण्यासाठी राज्यांची सक्षम यंत्रणा त्वरीत कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने विशेष लवाद कक्ष स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
**पाटबंधारे विभाग,**
शासन निर्णय क्रमांक - मांडवी — २०१०/प्र.क्र.३२७/१०/जसंनि
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई — ४०००३२.
दिनांक - ०८ /११/२०११

संदर्भ :- १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्रमांक- कोपाविम/तां.२/मांडवी लवाद/ ५१०९/सन २०१० दि. ७/१२/२०१०
२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्रमांक- कोपाविम/तां.२/महादयी खोरे/३६२/सन २०११ दि. २८/१/२०११

**प्रस्तावना :-**

मांडवी नदी कर्नाटक व गोवा या राज्यातून वाहणारी पश्चिम वाहिनी नदी असून या नदीचे काही जलग्रहण क्षेत्र महाराष्ट्र राज्यात येते. या मांडवी नदीच्या खो-यामध्ये कर्नाटक शासनाने प्रस्तावित केलेल्या प्रकल्पांविरुध्द गोवा शासनाने सर्वोच्च न्यायालयात दावा क्र.४/०६ दाखल केला होता. सदर दाव्याच्या अनुषंगाने सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार केंद्र शासनाच्या जलसंसाधन मंत्रालयाने दि.६.११.२०१० च्या अधिसूचनेद्धारे ‘महादई जलविवाद अभिकरण‘ गठीत केले आहे.

मांडवी खोऱ्यात उपलब्ध होणाऱ्या संपूर्ण जलसंपत्तीचा अभ्यास करुन महाराष्ट्राच्या वाटयाला येणारी संपत्ती निश्चित करुन त्याचा वापर करण्यासाठी प्रकल्प निश्चित करणे व त्यांचे विविध वापर यासाठी पाणी वापर आराखडा लवादासमोर सादर करणे आवश्यक आहे. महाराष्ट्र

राज्याला महादई नदी खोऱ्यातील पाण्याचा जास्तीत जास्त हिस्सा मिळण्यासाठी आणि राज्यातील शेतकऱ्यांना सिंचनाच्या अधिक सोयी उपलब्ध करुन, शेतकऱ्यांच्या हिताचे रक्षण करण्यासाठी, नवीन लवादासमोर राज्याची बाजू प्रभाविपणे मांडणे आवश्यक आहे. सदर लवाद राज्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा व संवेदनशील अशा स्वरुपाचा असल्याने या लवादाचे काम पाहण्यासाठी व महाराष्ट्र राज्याची भूमिका सुयोग्यरित्या आणि प्रभावीपणे मांडण्यासाठी महादई पाणी तंटा लवाद विशेष कक्ष उभारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंबधात कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे यांनी पाठविलेल्या संदर्भाधीन पत्रातील प्रस्तावाच्या अनुषंगाने सांगोपांग विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महादई पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याची सिंचन विषयक पाण्याच्या मागणी संदर्भातील बाजू आणि या संदर्भातील राज्याचा दावा अधिक प्रकर्षाने, सुसंगतपणे, परिणामकारकपणे व अभ्यासपूर्वक पद्धतीने माडण्याच्या दृष्टीने कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, कोंकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी, यांच्या नियंत्रणाखाली विशेष कक्ष स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

महादई पाणी तंटा लवाद कामासाठी प्रस्तावित करण्यात आलेल्या विशेष कक्षाचे कामकाज ३ वर्षासाठी गृहित धरण्यात आले असून या विशेष कक्षात १ कार्यकारी अभियंता, २ उप अभियंता, २ शाखा अभियंता, २ लघु लेखक, १ शिपाई व १ चौकीदार अशी पदे असतील  सदर विशेष कक्षासाठी जलसंपदा विभागांतर्गत कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या अखत्यारितील अस्तित्वातील अधिकारी व कर्मचाऱ्यांची सदर विशेष कक्षात नेमणूक करुन कामकाज पार पाडले जाईल. प्रस्तुत विशेष कक्षाच्या दैनंदीन कामाचे नियंत्रण अधीक्षक अभियंता, कोंकण पाटबंधारे मंडळ रत्नागिरी यांच्याकडून ठेवले जाईल. तथापि, या लवाद कक्षाचे प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रण कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे राहील. राज्य शासनाची बाजू लवादासमोर समर्थपणे मांडण्याची अंतिम जबाबदारी कार्यकारी संचालक, कोंकण

पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांची असेल. प्रस्तूत लवादाच्या अनुषंगाने शासन स्तरावरील कामकाज मुख्य अभियंता (जलसंपदा) व सह सचिव, जलसंपदा विभाग हे पाहतील.

वर नमूद लवादासाठी निर्माण करण्यात आलेल्या विशेष कक्षाकडील कर्मचारी व अधिकारी यांचे वेतन व भत्ते व अनुषंगीक बाबी यांवर होणारा खर्च कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्याकडून त्यांना उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११११०८१५५७५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु. रा. बावस्कर)
शासनाचे उप सचिव

प्रत,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १ व २, मुंबई/ नागपूर.
वित्त विभाग (व्यय ), मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यकारी संचालक कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता (जलसंपदा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलसंपदा कोंकण प्रदेश, मुंबई.
मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
उप सचिव (ज.सं.)/ उपसचिव (जवि)/ उपसचिव (प्रशासन)/ आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधिक्षक अभियंता, कोंकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.
कार्यकारी अभियता, पाटबंधारे प्रकल्प, बांधकाम विभाग, रत्नागिरी.
कार्यासन अधिकारी (कार्यासन अर्थ-१/ अर्थ-२/ आ (प्रशि)/ आ-वर्ग-२/ आ (शा.अ.)/ आ( तां)/ आ (अ.तां.)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन (जसंनि) संग्रहार्थ.